सन ऑक्टोबर, २०२०- जून, २०२१ या टंचाई कालावधीत ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत. (लेखाशिर्ष २२१५ A१९५)

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२१/प्र.क्र. ४४/भाग-१/पापु-१४**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २० ऑक्टोबर, २०२१

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र. १९१/पापु-१४, दिनांक २७ नोव्हेंबर, २०१८
३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक : मजीप्रा/वित्त-२/निधी/टंचाई/५९ दिनांक ३०.०६.२०२१
४) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे क्रमांक:विकास/अका/कावि/८९१/२०२१, दि.२३.०८.२०२१ रोजीचे पत्र.
५) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे क्रमांक: विशा/शा.अ.-१/प्र.क्र.०४/२०२०,दि.१७.८.२०२१ रोजीचे पत्र.
६) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्रमांक:१) ससंता/कावि-आ-/पाणी/२८७/२०२१,.२७.०७.२०२१ व २) ससंता/कावि-आ-/पाणी/५८२/२०२१,.३०.०७.२०२१ रोजीची पत्रे.

**प्रस्तावना** :-

राज्यातील ग्रामीण भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च (२२१५ ए १९५) या लेखाशीर्षाखाली या विभागाकडून उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येतो. सन २०२०-२१ च्या टंचाई कालावधीत केलेल्या / करावयाच्या उपायोजनांसाठी (ऑक्टोबर, २०२० ते जून, २०२१) या कालावधीचा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई, तसेच पुणे, अमरावती व नागपूर विभागाचा निधी मागणीचा प्रस्ताव विभागास प्राप्त झाला आहे. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात, लेखाशीर्ष ( २२१५ ए १९५) ३१, सहायक अनुदाने (योजनेत्तर) या उद्दीष्टांतर्गत अर्थसंकल्पीय केलेला निधी विभागीय आयुक्त

पुणे, अमरावती व नागपूर व सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी मागणी केलेल्या व प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपाययोजनांसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

ग्रामीण भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार विभागीय आयुक्त, पुणे, अमरावती व नागपूर तसेच सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना त्यांच्या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ उपाययोजनांवरील प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपाययोजनांचा खर्च भागविण्यासाठी (**लेखाशिर्ष २२१५ ए १९५**) **अंतर्गत रुपये ३६९०.५० लक्ष (अक्षरी छत्तीस कोटी नव्वद लाख पन्नास हजार फक्त)** इतका निधी प्रचलित स्थायी शासन निर्णयामध्ये विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**या शासन निर्णयान्वये करण्यात येणाऱ्या निधी वितरणाचा तपशील खालीलप्रमाणे आहे. तसेच जिल्हा निहाय निधी वितरणाचा तपशील बाबतचे विवरणपत्र सोबत जोडले आहे.**

**(रक्कम रु.लाखात)**

| अ.क्र | विभागीय आयुक्त | वाटप करावयाची रक्कम |
|---|---|---|
| १ | पुणे | ५९१.९७० |
| २ | अमरावती | ६९३.७५५ |
| ३ | नागपूर | २०९७.५९५ |
| ४ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | ३०७.१८० |
| **एकूण** | | **३६९०.५००** |

### अटी व शर्ती

१) विभागीय आयुक्त, **पुणे, अमरावती व नागपूर** यांनी ग्रामीण भागातील टंचाई अंतर्गत उपाययोजनांसाठीचा निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना थेट वितरीत करावा.

२) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी पिण्याच्या पाण्याच्या टंचाई अंतर्गत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येणाऱ्या उपाययोजनांसाठीचा निधी संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना वितरीत करण्यात यावा

३) **सन २०२०-२१ (माहे ऑक्टोबर, २०२० ते जून, २०२१ )** या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांकरीता तसेच या कालावधीतील प्रलंबित देयकांच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा. अन्य टंचाई कालावधीतील उपाययोजनांसाठी सदर निधी खर्ची टाकता येणार नाही.

४) विभागीय आयुक्त यांनी निधी प्राधान्याने विहिर अधिग्रहण, टँकरने पाणी पुरवठा करणे तसेच नवीन विंधन विहीर घेणे या उपाययोजनांना वितरीत करावा तसेच विभागीय आयुक्त यांनी सादर केलेल्या प्रस्तावात जरी शासन स्तरावरुन मान्यता देण्यात आलेल्या उपाययोजनांसाठीची मागणी केली नसली तरी या उपाययोजनांना सुध्दा संबंधित प्रशासकीय मान्यतेच्या आदेशानुसार प्राधान्याने निधी वितरित करण्यात यावा.

५) सदर निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account ) अथवा बँक खात्यात न ठेवता तो कंत्राटदारांना थेट Electronic Clearing Services/RTGS द्वारे वितरीत केला जाईल याची दक्षता घ्यावी.

६) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनांना निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी.

७) यापुढे टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे याबाबत बाब निहाय/ उपाययोजनानिहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती, तसेच त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावीत. त्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार याची नोंद घेण्यात यावी.

८) ज्या ग्रामीण उपाययोजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत आहेत, त्या उपाययोजनांसाठीचा निधी मागणी नुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिला आहे. यास्तव जिल्हा परिषद अथवा जिल्हाधिकारी यांच्या मार्फत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला निधी वितरीत करण्यात येऊ नये.

९) **सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी वितरीत करण्यात आला आहे, त्यामधून देयके अदा करताना खाजगी टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असेल व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फेऱ्या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणा-या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फे-या अनुज्ञेय ठरणार नाहीत. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाही म्हणून देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांसाठी निधी वितरीत करण्यात येऊ नये**

१०) **या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी टंचाई कालावधी सन २०२०-२१ करिता वितरीत करण्यात येत असल्याने व प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपायोजनांसाठी असल्याने सदर निधी त्वरित खर्ची टाकणे अपेक्षित आहे. यास्तव सदर निधी त्वरित चार दिवसात संबंधित कार्यालयांना / जिल्हा परिषद/ जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा. या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र, दिनांक ३० नोव्हेंबर, २०२१ पूर्वी शासनास सादर करावी.**

११) **नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून मागील वर्षात घेण्यात आलेल्या विविध योजना / पाणी पुरवठा विषयक कामे पूर्ण करण्यात आली असल्याचे जिल्हाधिकारी/ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद / सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी खात्री करावी.**

१२) **पाणी जीवनावश्यक / अत्यावश्यक बाब असल्याने, त्या आडून गैरप्रकार होणार नाहीत, त्याच त्याच योजना पुन्हा- पुन्हा दरवर्षी घेण्यात येत नाहीत व त्यावर अनावश्यक खर्च करण्यात येत नाही, याची खात्री संबंधित विभागीय आयुक्त/ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी करावी.**

१३) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्तांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे त्रैमासिक पडताळणी विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तसेच सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी घ्यावी. **वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावा**. आवश्यक तेवढयास निधीची मागणी करावी. अधिकची निधी मागणी करु नये.

१४) या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु. ३०७.१८ लाख याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक ( वित्त ) ( श्री. राजेंद्र धर्मराज मडके ) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री. वसंत माने) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक (वित्त), (श्री. राजेंद्र धर्मराज मडके) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. वसंत माने) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१५) क्षेत्रीय कार्यालयांच्या प्राप्त मागणी नुसार सदर निधी वितरीत करण्यात येत असला तरी, टंचाई कालावधी सन २०२०-२१ (माहे ऑक्टोबर, २०२० ते माहे जून, २०२१) करिता आवश्यक तेवढाच निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे आहरित करावा. अतिरिक्त निधी आहरित केल्यास व अखर्चित राहिल्यास त्याबाबत संबंधितांविरुद्ध शिस्तभंगच्या कार्यवाहीकरिता सक्षम प्राधिकाऱ्यांना प्रस्ताव सादर करावा. या कार्यवाहीबाबत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास अवगत करावे.

१६) सदर वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबत उपाययोजनानिहाय, टंचाई कालावधीनिहाय माहिती उपलब्ध करुन द्यावी.

१७) याबाबतचा खर्च या शासन निर्णयातील निधी वितरण बाबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावा.

१८) **सन २०२०-२१ या चालू वित्तीय वर्षात "मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५) या उपलेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

१९)आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व देयकासोबत जोडल्या जाणा-या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून/ उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपाचारिक संदर्भ क्र. ३३७/व्यय-३, दिनांक २७.०९.२०२१ अन्वये प्राप्त मान्यतेनुसारं निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११०२०१०५३५४६०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, pseudonym=04E9E52AD2D2BFBC7A8BAB7F38309149E2A32DAE, serialNumber=4412BECACEF186C3494A7DFFC4896B9FFD9D66E8EC00DF8E35709DC13741075D, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2021.10.20 12:42:52 +05'30'

**( वसंत माने )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, महसूल ( मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई

७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१०. विभागीय आयुक्त, पुणे, अमरावती व नागपूर
११. जिल्हाधिकारी ( सर्व )
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व )
१३. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद ( सर्व )
१४. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ( सर्व )
१५. मुख्याधिकारी (सर्व )
१६. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
१७. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
१८. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१९. उप सचिव (पापु-१४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
२०. निवड नस्ती -पापु-१४

## विवरणपत्र

(शासन निर्णय क्रमांक : टंचाई २०२१/प्र.क्र.४४/भाग-१/पापु-१४, दि. २० ऑक्टोबर,२०२१ सोबतचे विवरणपत्र)
टंचाई कालावधी सन २०२०-२१ अंतर्गत जिल्हा निहाय वितरीत करावयाच्या निधी मागणी बाबतचे विवरणपत्र.

(रु. रुपयात)

| विभाग | जिल्हा | निधी वितरण | टंचाई कालावधी |
|---|---|---|---|
| पुणे | पुणे | ५,८९,२०,००० | ऑक्टों. २०२० ते जून २०२१ |
| | सातारा | १,३७,००० | ऑक्टों. २०२० ते मार्च २०२१ |
| | सांगली | १,४०,००० | |
| | **एकूण** | **५,९१,९७,०००** | - |
| अमरावती | अकोला | ३,८२,१६,५०० | ऑक्टों. २०२० ते जून २०२१ |
| | बुलढाणा | ३,११,५९,००० | |
| | **एकूण** | **६,९३,७५,५००** | |
| नागपूर | नागपूर | ११,९६,३१,००० | ऑक्टों. २०२० ते जून २०२१ |
| | वर्धा | ४,३९,७८,००० | |
| | गोंदिया | १,११,३५,५०० | |
| | भंडारा | १,३८,९२,५०० | |
| | चंद्रपूर | ८४,००,५०० | |
| | गडचिरोली | १,२७,२२,००० | |
| | **एकूण** | **२०,९७,५९,५००** | |
| महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | अमरावती | २,०५,१२,५०० | ऑक्टों. २०२० ते जून २०२१ |
| | अकोला | १,०२,०५,५०० | |
| | **एकूण** | **३,०७,१८,०००** | |
| **एकूण एकंदर** | | **३६,९०,५०,०००** | - |

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, pseudonym=04E9E52AD2D2BFBC7A8BAB7F38309149E2A32DAE, serialNumber=4412BECACEF186C3494A7DFFC4896B9FFD9D66E8EC00DF8E35709DC13741075D, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2021.10.20 12:43:41 +05'30'

**(वसंत माने)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**